**केवल वराह दरवाजा, गडमंदिर, ता. रामटेक, जि. नागपूर या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन व दुरुस्तीच्या कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: स्मारके २०२४/प्र.क्र.७८/सां.का.३**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
**दिनांक** : ०४ **मार्च**, २०२४

**वाचा :** संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालय, मुंबई यांचे पत्र जा.क्र.स्मारके २०२४/७३३, दि.२३.०२.२०२४.

**प्रस्तावना:-**

नागपूर जिल्ह्यातील प्रभु श्रीरामांच्या पदस्पर्शाने पावन झालेल्या रामटेक शहरात गिरी शिखरावरील श्री.रामास्वमी मंदिर संकुल हे भाविक व पर्यटकांचे आकर्षणाचे केंद्र आहे. या स्थळाचे ऐतिहासिक महत्व लक्षात घेवून श्री.रामास्वमी मंदिर संकुल परिसरातील स्मारके (मंदिरे व दरवाजे) राज्य संरक्षित स्मारक म्हणून घोषित करण्यात आलेली आहे. सदर मंदिर हे वाकाटककालीन मंदिर आहे. मा.उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ यांच्या जनहित याचिका क्र.१३/२०१० च्या आदेशानुसार न्यायालयीन मित्र ॲड. आनंद जयस्वाल यांनी दि.०२.०७.२०२१ रोजीच्या पाहणीत केलेल्या सूचनांप्रमाणे या राज्य संरक्षित स्मारकाच्या मंदिराचे जतन व दुरुस्ती कामाचे रु.२,५९,३६,८६७/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालय, मुंबई यांनी संदर्भाधीन पत्रान्वये केली आहे. त्यानुसार या स्मारकाच्या जतन व दुरुस्तीच्या कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

या शासन निर्णयान्वये केवल वराह दरवाजा, गडमंदिर,ता.रामटेक,जि.नागपूर या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन व दुरुस्तीच्या कामाच्या रु.२,५९,३६,८६७/- (अक्षरी रूपये दोन कोटी एकोणसाठ लाख छत्तीस हजार आठशे सदुसष्ट मात्र ) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. या साठी होणारा खर्च मागणी क्र झेडडी-०२, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, २२०५ कला व संस्कृती (००) १०३, पुरातत्वशास्त्र, (०१) (०६) राज्यातील ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्ट्या महत्वाचे किल्ले व धार्मिक स्थळे यांची जपणूक व संरक्षण (कार्यक्रम) २२०५ १३०२ २७ लहान बांधकामे या लेखाशिर्षात त्या त्या वर्षी उपलब्ध होणाऱ्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

०३. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबंधिच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

०४. हा वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र -२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग २, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७(२) "अ" नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०३०४१६५८४४४२२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2024.03.04 17:07:57 +05'30'

**( नंदा राऊत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. मंत्री (सां.का.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (सां.का.), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
उप सचिव (सां.का.३), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालय, मुंबई.
सहायक संचालक, पुरातत्व विभाग, नागपूर.
महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल-२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
महालेखापाल-१, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल-२, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
अवर सचिव (अर्थसंकल्प),पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, सां.का.३